**सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत हाती घ्यावयाच्या रस्ते, इमारती व पुलांच्या प्रकल्पाकरिता सल्लागाराची नेमणूक करणे - सुधारित सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२०१८/प्र.क्र.७५/रस्ते-९अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक : २५ जानेवारी, २०१९

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक खाक्षेस-१०९५/प्र.क्र.२१६/ रस्ते-८, दिनांक ११.१२.१९९७
२) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक खाक्षेस-२०१५/प्र.क्र.२०९/ रस्ते-९अ, दिनांक २४.०१.२०१७

**<u>प्रस्तावना -</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागात रस्ते, पुल व इमारतीच्या संकल्पनासाठी, बांधकामासाठी तसेच विशेष दुरुस्तीसाठी पुरेसे तांत्रिक नैपुण्य जरी उपलब्ध असले तरी, काही वेळा अपु-या कर्मचारी वर्गामुळे अथवा काही प्रसंगी गुंतागुतीचे तांत्रिक प्रश्न, आधुनिक तंत्रज्ञानाची गरज, पर्यावरण विषयक अभ्यास व तत्सम बाबी, सुसाध्यतेची पडताळणी, संशोधनात्मक अभ्यास तसेच खाजगीकरणातुन करावयाच्या प्रकल्पांसाठी कायदेविषयक, अर्थविषयक अन्वेषण अशा बाबींसाठी सल्लागार किंवा तज्ञ नेमण्याची आवश्यकता भासते. याअनुषंगाने शासनाने दिनांक २४.०१.२०१७ रोजी सल्लागार नेमण्याबाबतचा शासन निर्णय प्रसिध्द केला. सद्यस्थितीत कामाच्या स्वरुपात झालेल्या बदलामुळे तसेच भाववाढीमुळे सदर शासन निर्णय अधिक्रमित करणे शासनाच्या विचाराधीन होते. यानुसार संदर्भाधीन अनुक्रमांक ०२ येथील दिनांक २४.०१.२०१७ रोजीच्या शासन निर्णयात <u>खालील सुधारणा</u> करून सुधारीत शासन निर्णय खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

**<u>१. सल्लागार / तज्ञ नेमणे अनुज्ञेय असेल अशा बाबी</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत सहजरित्या पार पाडता येऊ न शकणा-या अशा पुढील प्रकरणी सल्लागार / तज्ञ नेमणे अनुज्ञेय असेल.

१) गुंतागुतीची दुरुस्ती व पुनर्स्थापित बांधकामाची (Rehabilitation) प्रकरणे.
२) असाधारण गुंतागुंतीच्या विशेष प्रश्नाबाबतची प्रकरणे.
३) प्रकल्प व्यवस्थापन (Project Management), पर्यवेक्षण (Supervision), उपकरण साधना (Instrumentation), प्रकल्प अहवाल (Report) आणि संनियंत्रण (Monitoring)
४) गुंतागुंतीच्या बांधकामाचे विशेषीकृत संकल्पन (Design) आणि तपासणी (Proof Consultancy)
५) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या रस्ते व इमारती यांचे आलेखन, संकलन, व रस्तेदुरुस्ती बाबत संगणक कामासंबंधीचे विकसन. (Software Development)
(टीप :- खाजगीकरणांतर्गत/अर्थसंकल्पीय/ठेव अंशदान व इतर कोणत्याही योजनेतील ३० मीटर वरील पूल, रेल्वे उड्डाणपूल व इतर बांधकाम यांची संकल्पचित्रे अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल) यांचेकडूनच तपासण्यात यावीत. अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल) यांच्याकडे मनुष्यबळाची कमतरता असल्यास किंवा काही विशेष प्रकारच्या बांधकामाचे संकल्पचित्र तपासण्यास संकल्पचित्र मंडळ असमर्थ असल्यास

अधीक्षक अभियंता, संकल्पचित्र मंडळ (पूल) यांनी तसे संबंधीत मुख्य अभियंता यांना प्रस्तावित करावे. तद्नंतर सदर संकल्पचित्रे मुख्य अभियंता यांनी खाजगी सल्लागार नेमूण तपासावीत.)

६) प्रकल्पांचे सर्वेक्षण व अन्वेषण.

७) बांधकामाचा वातावरणावर होणा-या आघातांसंबंधी तसेच प्रकल्पांच्या तांत्रिक आणि आर्थिक सुसाध्यतेची पडताळणी करुन निर्धारण व अहवाल.

८) भुसंपादन, वनजमीनी हस्तांतरणासाठी प्रस्ताव तयार करणे. तसेच सेवावाहिन्या स्थलांतरीत करण्याबाबतचा प्रस्ताव करणे व प्रक्रिया पार पाडणे.

९) लवाद चालवण्यासाठी टेक्नोलीगल सल्लागार नेमणे.

१०) रस्त्यावरील वाहतुक गणना व अहवाल.

११) ॲकॉस्टीकल डीझाईन.

१२) लॅन्ड स्केपींग डिझाईन, गार्डनींग, हॉर्टीकल्चर.

१३) खासगी वास्तुविशारद.

१४) फायर व सेफ्टी सल्लागार.

१५) MEP व HVAC कन्सल्टंट सल्लागार.

१६) कायदेविषयक बाबींवर सल्ला घेणे.

१७) सा.बां.विभागाचे कामकाज नियोजन, भविष्यकालीन इमारती व रस्ते बांधकाम क्षेत्रामध्ये नवीन उपलब्ध तंत्रज्ञानाच्या अनुषंगाने करावयाचे धोरणात्मक बदल व त्यासाठी Strategy ठरविणे.

१८) सा.बां.विभागाच्या कामाशी संबंधित इतर विषय.

**२. सल्लागार नेमणूकीची पध्दत व त्याबाबतचे अधिकार :-**

सल्लागार नेमणूक पुढीलपैकी एका पध्दतीने करावी.

**२.१ निवड सूचिवरील सल्लागारांची सरळ नियुक्ती**(Direct Appointment from Empanelled List) :-

सल्लागारांची, कामाच्या व्याप्तीनुसार वर्गवारी **परिशिष्ट-अ (Annexure-A)** मध्ये देण्यात आली आहे. प्रत्येक वर्गामध्ये किमान ५ सल्लागारांची नोंदणी करण्यात यावी.

**२.१.१ सर्व साधारण सल्लागार सेवा :-**

संबंधित प्रादेशिक विभागाच्या मुख्य अभियंता यांनी त्यांच्या कार्यक्षेत्रासाठी नामिका प्रवेशाकरिता (Empanelment) सल्लागारांकडून जाहिर प्रस्तावाव्दारे विहित नमुन्यात माहिती मागवून वर्ग निहाय सल्लागार सूची तयार करावी. सदरहू सल्लागारांची निवडसूची दर तीन वर्षानी मुख्य अभियंता यांनी अद्ययावत करावी. दिनांक १ मे, २०१७ रोजी प्रथम सल्लागारांची यादी (Empanel list) अद्यावत करावी. मार्गदर्शनासाठी सल्लागार सेवेचे दर **परिशिष्ट-ब (Annexure-B)** मध्ये देण्यात आले आहेत. प्रत्येत प्रकारच्या सल्ल्याकरीता निश्चित केलेल्या शुल्कास निवडसूचिवरील सल्लागाराची मान्यता असणे आवश्यक आहे. अशा संमतीची दप्तरीनोंद करणे आवश्यक आहे. सल्लागारांकडून काम करुन घेताना तांत्रिक दर्जा अधिक महत्वाचा असल्याने सदर सरळ नेमणूक करताना सदर बाबींचा विचार करुन मुख्य अभियंता यांच्या स्तरावरील निवड समितीने नियुक्ती करावी.

परंतु अशा प्रकारच्या सरळ नेमणुकीद्वारे एका सल्लागारास एकाचवेळी व एका आर्थिक वर्षात रु.१.०० कोटी पेक्षा जास्त सल्लागार शुल्क किंमतीची कामे देण्यात येऊ नयेत.

अशी नेमणूक करताना सल्लागारांच्या यादीमधील (Empanelled List) किमान तीन सल्लागारांकडून दर पत्रके (Quotation) प्राप्त करुन घेण्यात यावी व त्यापैकी सर्वात कमी देकार देणा-या सल्लागारास काम देण्यात यावे. वरील तीन सल्लागारांपैकी एखादा सल्लागार वर नमूद केलेल्या अटीमुळे बाद होत असेल तर त्या ऐवजी सल्लागारांच्या यादीमधील (Empanelled List) नंतरच्या सल्लागाराकडून देकार घेण्यात यावेत.

सदर प्रकारे सरळ नेमणुक करताना मुख्य अभियंता यांनी संबंधित अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांजकडुन सल्लागाराच्या तांत्रिक क्षमता, मनुष्यबळ उपलब्धता व समान प्रकारच्या कामाचा अनुभवावर आधारित शिफारस मागविणे व त्यावर समितीने मत अभिलिखित करणे बंधनकारक राहील.

एकाच प्रकल्पात विविध बाबी वेगवेगळया सल्लागारांकडुन करुन घेताना एकूण प्रकल्प अहवालात सूसूत्रता राहील याची जबाबदारी मुख्य अभियंता यांच्यावर असेल.

२.१.२. <u>तज्ञ व्यक्तिकडून सल्लागार सेवा :-</u>

एखादी गुंतागुंतीची समस्या सोडविण्याकरिता ब-याचदा तज्ञ व्यक्तीकडुन सल्लागार सेवा अपेक्षित असते. अशा प्रकरणात मॅन अवर (मनुष्य तास) आधारावर सल्लागार सेवा घेणे संयुक्तिक राहील. सार्वजनिक बांधकाम विभागातील संबंधित प्रादेशिक विभागातील मुख्य अभियंता यांनी जाहीर निविदेद्वारे प्रस्ताव मागवून तज्ञ व्यक्तीची निवड सुची तयार करावी जेणे करुन त्यापैकी कोणत्याही तज्ञ व्यक्तीस समस्येचा प्रकार, स्थळ कालावधी या आधारांवर नियुक्त करणे शक्य होईल.

या निवड सुचीतील सल्लागारांना मुख्य अभियंता यांनी ठरविलेले मॅन अवर वर आधारित शुल्क मान्य असणे आवश्यक आहे व अशी दप्तरी नोंद करणे आवश्यक आहे. मार्गदर्शनाकरिता मुख्य अभियंता समितीने शिफारस केलेले मॅन अवर शुल्क **परिशिष्ट-क (Annexure-C)** मध्ये दिले आहेत. एखादया तज्ञास कामावर नियुक्त करताना संबंधित तज्ञ त्या वेळेत उपलब्ध होऊ शकतील याची खात्री करुन घेण्यात यावी.

२.१.३. <u>सल्लागाराची सरळ नियुक्ती करण्याबाबतचे अधिकार खालीलप्रमाणे असतील :-</u>

अ) सर्वसाधारण सल्लागार सेवा :-

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| | **हायब्रीड ॲन्युईटी वगळता अन्य प्रकरणी** | |
| १ | रुपये ५०.०० लक्ष पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |
| २ | रुपये ५०.०० लक्ष ते २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ३ | रुपये २.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सल्ल्याने) |
| | **हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत कामांकरिता (डी.पी.आर., स्वतंत्र अभियंता नियुक्ती व हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत अन्य कामांसाठी)** | |
| ४ | रुपये २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| | **हायब्रीड ॲन्युईटी वगळता अन्य प्रकरणी** | |
| १ | रुपये ५०.०० लक्ष पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |
| २ | रुपये ५०.०० लक्ष ते २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ३ | रुपये २.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सल्ल्याने) |
| | **हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत कामांकरिता (डी.पी.आर., स्वतंत्र अभियंता नियुक्ती व हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत अन्य कामांसाठी)** | |
| ५ | रुपये २.०० कोटी ते ५.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ६ | रुपये ५.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सहमतीने) |

ब) तज्ञ व्यक्तीकडून सल्लागार सेवा :-

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| | **हायब्रीड ॲन्युईटी वगळता अन्य प्रकरणी** | |
| १ | रुपये ५०.०० लक्ष पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |
| २ | रुपये ५०.०० लक्ष ते २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ३ | रुपये २.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सल्ल्याने) |
| | **हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत कामांकरिता (डी.पी.आर., स्वतंत्र अभियंता नियुक्ती व हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत अन्य कामांसाठी)** | |
| ४ | रुपये २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |
| ५ | रुपये २.०० कोटी ते ५.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ६ | रुपये ५.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सहमतीने) |

## २.२ जाहिर निविदेद्वारे सल्लागाराची नियुक्ती :-

या पध्दतीत वर्तमानपत्रात मोठया प्रमाणात प्रसिध्दी देऊन इच्छुक सल्लागारांकडुन खुले स्पर्धात्मक देकार काही अर्हता-अटीसह (Qualification) बोलाविण्यात यावे. याबाबतीत मुख्य अभियंता यांनी कामाच्या प्रकारानुसार किमान अर्हता ठरवावी. सल्लागारांकडुन प्राप्त झालेल्या देकारांचे मुल्यांकन करुन सल्लागाराची नेमणुक करावी. यामध्ये तांत्रिक गुणवत्तेस अधिक महत्व देण्यात यावे. तांत्रिक व आर्थिक मुल्यमापनाचे निकष सुकाणु समिती ठरवील. ही सुकाणु समिती पुढीलप्रमाणे राहील.

अ) सल्लागार शुल्क रु. ५ कोटी पर्यंत असल्यास समितीची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य अभियंता (संबंधीत) | -अध्यक्ष |
| २) | अधीक्षक अभियंता (संबंधीत) | - सदस्य |
| ३) | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ (संबंधित प्रादेशिक विभाग) | - सदस्य |
| ४) | कार्यकारी अभियंता (संबंधीत) | - सदस्य सचिव |

ब) सल्लागार शुल्क रु. ५ कोटी पेक्षा जास्त असल्यास समितीची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १) | मुख्य अभियंता व सहसचिव, सा.बां.विभाग, मुंबई | -अध्यक्ष |
| २) | मुख्य अभियंता (संबंधीत) | - सदस्य |
| ३) | अधीक्षक अभियंता (संबंधीत) | - सदस्य |
| ४) | अधीक्षक अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ (संबंधित प्रादेशिक विभाग) | - सदस्य |
| ५) | कार्यकारी अभियंता (संबंधीत) | - सदस्य सचिव |

(सदर समितीचे गठण शासन स्तरावर करण्यात येईल)

वरील अनु क्र.१ मधील ११, १२ व १३ साठी आवश्यक सल्लागाराकरीता त्या प्रादेशिक विभागाचा उपमुख्य वास्तू शास्त्रज्ञ हा समितीचा सभासद असेल. उपमुख्य वास्तु शास्त्रज्ञ पद रिक्त असल्यास अन्य विभागातील उप मुख्य वास्तु शास्त्रज्ञाची नियुक्ती मुख्य अभियंता यांनी करावी.

या पद्धतीनुसार सल्लागाराची नेमणूक करण्याचे अधिकार खालीलप्रमाणे असतील :-

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| | **हायब्रीड ॲन्युईटी वगळता अन्य प्रकरणी** | |
| १ | रुपये ५०.०० लक्ष पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता स्तरावरील निविदा समिती |
| २ | रुपये ५०.०० लक्ष ते २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती |
| ३ | रुपये २.०० कोटी वरील | सार्वजनिक बांधकाम विभाग स्तरावरील निविदा समिती (वित्त विभागाच्या सहमतीने) |
| | **हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत कामांकरिता (डी.पी.आर., स्वतंत्र अभियंता नियुक्ती व हायब्रीड ॲन्युईटी अंतर्गत अन्य कामांसाठी)** | |

| अ.क्र. | कामाचे स्वरुप | सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|
| | हायब्रीड ॲन्युईटी वगळता अन्य प्रकरणी | |
| ४ | रुपये २.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग यांच्या अध्यक्षतेखालील निविदा समिती |
| ५ | रुपये २.०० कोटी ते ५.०० कोटी पर्यंत (प्रत्येक प्रकरणी) | निविदा समिती, सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ६ | रुपये ५.०० कोटी पेक्षा जास्त (प्रत्येक प्रकरणी) | निविदा समिती, सार्वजनिक बांधकाम विभाग (वित्त विभागाच्या सहमतीने) |

**२.३** निवडसूची वरील सल्लागारामार्फत दिल्या गेलेल्या सेवामध्ये तांत्रिक दोष आढळल्यास तसेच अव्यवहार्य प्रकल्प तयार करणे, योग्य सर्वेक्षण, अन्वेषण न करणे, ठराविक मुदतीत काम पुर्ण न करणे/ चाल ढकल करणे वगैरे आढळल्यास निवडसूची मधील नाव रद्यबातल करण्याचे अधिकार मुख्य अभियंता यांना देण्यात येत आहेत.

**३. <u>सल्लागार / तज्ञ यांच्या शुल्काची तरतूद :-</u>**

सल्लागारांना /तज्ञांना शुल्क अदा करताना खालील सूचनाचे पालन करावे.

१) जे प्रकल्प अर्थसंकल्पात समाविष्ट असतील अशा प्रकल्पांच्या बाबतीत सल्लागार नेमण्याची आवश्यकता भासली तर त्यांचे शुल्क कामाच्या आकस्मिक खर्चामध्ये समाविष्ट करावे व आवश्यकतेनुसार त्याचा सुधारीत अंदाजपत्रकात समावेश करावा.

२) जेथे सल्लागार नेमण्याची सुरुवातीपासूनच गरज भासणार असेल तेथे अंदाजपत्रकात तशी तरतूद करावी.

३) जरुर तेथे अर्थसंकल्पात वेगळी बाब समाविष्ट करुन शुल्काचा खर्च भागविण्यात यावा.

४) दुरुस्ती/पुनर्स्थापना कामांकरीता ज्याप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील मुख्य अभियंता हयांचेकडे ढोबळ निधी ठेवला जातो. त्याप्रमाणे यासाठीही निधी राखून ठेवण्यात यावा.

५) सल्लागारांना द्यावयाचे शुल्क विहित निविदा नमुन्यातील अटी व शर्तीनुसार अदा करावे.

**४. <u>सल्लागार शुल्काची निश्चिती :-</u>**

सल्लागार शुल्क मुळ प्रकल्प किंमतीच्या टक्केवारीवर आधारीत असल्यास, सदर सल्लागार शुल्क एक रक्कमी निश्चित करण्यात यावे व तेच अंतिमत: सल्लागारास देय राहील. प्रकल्प किंमतीत कितीही वाढ झाली तरी सल्लागार शुल्कात कुठलीही वाढ देय होणार नाही अशी अट सल्लागाराच्या RFQ व RFP मध्ये नमूद करावी. तथापी काम वाढल्यास पूर्वी मान्य झालेल्या शुल्कामध्ये संपूर्ण प्रकल्पाचे काम करण्यात येईल अशी अट सल्लागाराच्या करारनाम्यामध्ये नमूद करण्यात यावी.

**५. <u>सल्लागार / तज्ञांची नेमणुक :-</u>**

वर नमूद केलेल्या पध्दतीपैकी योग्य अशा पध्दतीचे अवलंबन करुन सल्लागार /तज्ञ यांची नेमणूक करण्याबाबतचे समर्थन / कारणमीमांसा मुख्य अभियंता यांनी अभिलिखीत करावी.

हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २२६/व्यय-११, दिनांक १९.११.२०१८ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२५१६१४१७७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र: परिशिष्ट अ, ब ,क.

Sachin Manikrao Chivate

Digitally signed by Sachin Manikrao Chivate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e51dff58ad80dfdae3976edee46d1bf7934d01469cb4d916976c25305666b613, serialNumber=40ae84322c80d3e4ea1b574eb3782ed6cb133b938933bdf197ed5a1551d8622a, cn=Sachin Manikrao Chivate
Date: 2019.01.25 17:07:26 +05'30'

**( सचिन चिवटे )**
**अवर सचिव (इमारती) , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, नागपूर.
४. सर्व मुख्य अभियंते, सा.बां.प्रादेशिक विभाग
५. मुख्य अभियंता व सहसचिव, सा.बां.विभाग, मुंबई
६. सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.मंडळ/विशेष प्रकल्प मंडळ.
७. सर्व कार्यकारी अभियंते, सा.बां.विभाग/जिल्हा परिषद बांधकाम विभाग,
८. सर्व तांत्रिक अधिकारी, सा.बां.विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती (रस्ते ९-अ)

## परिशिष्ट-अ

### सल्लागारांची वर्गवारी

प्रकल्प बांधकाम किंमत (भूसंपादन व सेवावाहिन्या हलविणे इ. वगळून) व
व्याप्तीवर आधारित वर्गवारी
(नवीन प्रकल्प तसेच अस्तित्वातील प्रकल्पाच्या विशेष दुरुस्ती / जीर्णोध्दारसह)

| कामाचे स्वरुप | मोठे प्रकल्प | मध्यम प्रकल्प | छोटे प्रकल्प |
|---|---|---|---|
| रस्ते (मो-या व लहान पुलसह) परंतु मोठे पूल वगळुन | ५० किमी पेक्षा जास्त लांबीचे अथवा रु.५०० कोटी पेक्षा जास्त किंमतीचे | १० ते ५० किमी लांबीचे अथवा १०० ते ५०० कोटी रुपये किंमतीचे | १० किमी पर्यंत लांबीचे अथवा १०० कोटी पेक्षा कमी किंमतीचे (न्यूनतम २५ कोटी) |
| इमारती तसेच अंतर्गत /बाहय सजावट फर्निचर धरुन | बांधकाम क्षेत्रफळ १०००० चौ मी अथवा रु.१० कोटी पेक्षा जास्त किमतीचे | बांधकाम क्षेत्रफळ २००० ते १०००० चौ मी अथवा रु.५ ते १० कोटी किमतीचे | बांधकाम क्षेत्रफळ २००० चौ.मी अथवा रु.५ कोटी पेक्षा कमी किंमतीचे (न्यूनतम १ कोटी) |
| मोठे पूल व ॲप्रोच रस्त्यासह | ३०० मी पेक्षा जास्त लांबीचे अथवा रु.५० कोटी पेक्षा जास्त किंमतीचे | १०० ते ३०० मी लांबीचे अथवा रु.१० ते ५० कोटी पर्यंत किंमतीचे | ६० मी -१५० मी लांबीचे अथवा रु.१० कोटी पेक्षा कमी किंमतीचे (न्यूनतम २ कोटी) |

वर दर्शविलेल्या न्यूनतम किमतीपेक्षा कमी किंमतीच्या प्रकल्पासाठी तसेच अस्तित्वातील प्रकल्पाच्या विशेष दुरुस्ती / जीर्णोध्दार साठी सल्लागार नियुक्ती करण्यात येवू नये. परंतु खास बाब म्हणून नकाशे, अंदाजपत्रके, सर्वेक्षण, अन्वेषण वगैरे यासाठी प्रचलित जिल्हा दरसुची मधील दराने खाजगी संस्थेमार्फत काम करुन घेण्याचे अधिकार मुख्य अभियंता यांना प्रदान करण्यात आले आहेत.

## परिशिष्ट-ब

निवड सुची करील सल्लागारांना अदा करावयाचे अधिकतम मूल्य
(प्रचलित दराने सेवाकर वेगळा देण्यात यावा).
प्रकल्प वर्गवारी परिशिष्ट-अ मध्ये निर्देशिल्याप्रमाणे.

**तक्ता ब-१**

| कामाचे स्वरुप | मोठे प्रकल्प | मध्यम प्रकल्प | छोटे प्रकल्प |
|---|---|---|---|
| रस्त्यांचे (मो-या, लहान पूल धरुन) सर्वेक्षण, अन्वेषण, वाहतूक गणना व वाहतूक अहवाल, लँड फलॅन भूसंपादन प्रस्ताव, नकाशे व अंदाजपत्रके तयार करणे इत्यादी. | प्रचलित जिल्हा दरसूची प्रमाणे<br>जर एखादया बाबींचे दर संबंधित प्रादेशिक विभागाच्या कार्यकक्षेतील दरसूची मध्ये उल्लेखलेले किंवा अदययावत केलेले नसतील तर अशा बाबींसाठी इतर प्रादेशिक विभागांतर्गत प्रमाणित केलेले दर वापरण्याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता निर्णय घेतील. | | |
| इमारतीचे सर्वेक्षण अन्वेषण, भूसंपादन प्रस्ताव, नकाशे व अंदाजपत्रके तयार करणे. | प्रचलित जिल्हा दरसूची प्रमाणे<br>जर एखादया बाबींचे दर संबंधित प्रादेशिक विभागाच्या कार्यकक्षेतील दरसूची मध्ये उल्लेखलेले किंवा अदययावत केलेले नसतील तर अशा बाबींसाठी इतर प्रादेशिक विभागांतर्गत प्रमाणित केलेले दर वापरण्याबाबत संबंधित अधिक्षक अभियंता निर्णय घेतील. | | |

**तक्ता ब-२**

| स्ट्रक्चरल डिझाईन तयार करणे व संबंधित सेवा पुरविणे. (नवीन बांधकाम) | | | | |
|---|---|---|---|---|
| अ.क्र | कामांचे स्वरुप | मोठे प्रकल्प | मध्यम प्रकल्प | छोटे प्रकल्प |
| | | प्रकल्प बांधकाम किंमतीच्या टक्केवारी | | |
| १. | इमारती | ०.५ टक्के | ०.७५ टक्के | १.०० टक्के |
| २. | मोठे पूल | १.० टक्के | १.५० टक्के | २.०० टक्के |
| | | विशेष दुरुस्ती आणि जीर्णोध्दार किंमतीची टक्केवारी | | |
| १. | इमारती | १.५ टक्के | २.० टक्के | २.५० टक्के |
| २. | मोठे पूल | २.० टक्के | २.५० टक्के | ३.०० टक्के |
| | | मूळ सल्लागार शुल्काच्या | मूळ सल्लागार शुल्काच्या | मूळ सल्लागार शुल्काच्या |
| इतर सल्लागाराने केलेले काम फेर तपासणी करुन देणे (Proof Consultant) | | ५ टक्के | ७.५ टक्के | १० टक्के |

| | | | |
|---|---|---|---|
| प्रकल्पाच्या तांत्रिक बाबीमध्ये तसेच बांधकामा दरम्यान सेफटी सुरक्षा (Safety) सल्लागार म्हणून मार्गदर्शन व देखरेख करणे. | १ टक्के | १.५ टक्के | २ टक्के |
| प्रकल्प बांधकामावर देखरेख व गुणनियंत्रणासाठी स्वतंत्र अभियंता (IE) किंवा प्रमाणभूत अभियंता (ÆAE) किंवा प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) म्हणून काम करणे | सामान्यत आधारित धरल्या जाणा-या सल्लागार सेवासाठी (Terms Of Reference-TOR साठी) | | |
| | प्रकल्प बांधकाम किंमतीच्या टक्केवारी | | |
| Independence Engineer (IE) स्वतंत्र अभियंता | १.० टक्के | १.५ टक्के | २.० टक्के |
| Authority engineer (AE) प्रमाणभूत अभियंता | १.५ टक्के | २.० टक्के | २.५ टक्के |
| Project management consultant (PMC) प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार | २.० टक्के | ३.० टक्के | ४.० टक्के |

**तक्ता ब-३**

| रस्ते प्रकल्पाचा तांत्रिक व आर्थिक शक्याशक्यता अहवाल (Feasibility Report) तयार करणे | **मोठे प्रकल्प** | **मध्यम प्रकल्प** | **छोटे प्रकल्प** |
|---|---|---|---|
| | प्रकल्प बांधकाम किंमतीच्या टक्केवारी | | |
| प्राथमिक सर्वेक्षण , वाहतूक गणना व वाढी बाबत ढोबळ अहवाल विविध विकास पर्याय, अंदाजित किंमत तसेच भूसंपादन, पुर्नावसन, वातावरण व सामाजिक परिणाम या बाबतचे सूचक भाष्य तसेच प्रकल्प हाती घेण्याबाबतचे निधि उपलब्धतेसह स्पष्ट मत | ३ लक्ष<br>०.१० टक्के | २ लक्ष<br>०.२५ टक्के | रु. १,००,०००/-<br>०.५ टक्के |
| इमारती प्रकल्पाबाबत तांत्रिक व आर्थिक शक्य शक्यता अहवाल (Feasibility Report) तयार करणे | एक रकमी शुल्क | | |
| प्राथमिक सर्वेक्षण, सुयोग्य बांधकाम क्षेत्रफळ, निधी उपलब्धता, अंदाजित किंमत विविध विकास पर्याय तसेच भूसंपादन, पुर्नावसन, वातावरण व सामाजिक परिणाम या बाबतचे सूचक भाष्य तसेच प्रकल्प हाती घेण्याबाबतचे निधि उपलब्धतेसह स्पष्ट मत. | ३ लक्ष | २ लक्ष | रु.१,००,०००/- |
| प्रकल्पाचा विस्तृत अभियांत्रिकी अहवाल तयार करणे. | प्रकल्प बांधकाम किंमतीच्या टक्केवारी | | |
| रस्ते प्रकल्पः सर्वेक्षण, अन्वेषण, वाहतूकीचा सर्वांगिण अभ्यास (वाहतूक गणना, ॲक्सल लोड , वळणे, इंटरसेक्शन काउंट व लोकल कॉम्पोनंट करिता लॉस ऑफ रेव्हेन्यु), भौमितीक व स्ट्रक्चरल संरचना, अंदाजपत्रके, भुसंपादन प्रस्ताव, पुर्नवसन,प्रकल्पाचे वातावरण व सामाजिक परिणाम | १.५ टक्के | २.० टक्के | २.५ टक्के |
| इमारती प्रकल्पः सर्वेक्षण, अन्वेषण्, वास्तुरचना, स्ट्रक्चरल संरचना, अंदाजपत्रके, भुसंपादन प्रस्ताव, पुर्नवसन,प्रकल्पाचे वातावरण व सामाजिक परिणाम | १.५ टक्के | २.० टक्के | २.५ टक्के |

## परिशिष्ट-क

तज्ञ व्यक्तीमार्फत सेवा घेताना दयावयाचे अधिकतम दर ( सेवाकर व नैमित्रिक खर्च अतिरिक्त देण्यात यावा)

| अ.क्र | विविध तज्ञ | दर दिवसाचे अधिकतम दर | |
|---|---|---|---|
| | अर्हता मुख्य अभियंताच्या मार्गदर्शनाप्रमाणे | एका आर्थिक वर्षात व त्यापेक्षा ३० दिवस जास्त वेळ नियुक्ती असल्यास (प्रकार अ) | एका आर्थिक वर्षात जास्तीत जास्त १५ दिवस नियुक्ती असल्यास (प्रकार ब) |
| १ | Team Leader | ७५००/- | १००००/- |
| २ | Highway Expert | ५०००/- | ७५००/- |
| ३ | Pavement Expert | ५०००/- | ७५००/- |
| ४ | Traffic Expert / Transport Planner | ५०००/- | ७५००/- |
| ५ | Bridge Expert | ६०००/- | ९०००/- |
| ६ | Geo technical / Foundation Engineer | ५०००/- | ७५००/- |
| ७ | Tunnel Engineer / Expert | ५०००/- | ७५००/- |
| ८ | Bridge Rehabilitation Expert | ७५००/- | ९०००/- |
| ९ | Structural Audit & Repairs Methodology Expert | ७५००/- | ९०००/- |
| १० | Highway Designer | ५०००/- | ७५००/- |
| ११ | Bridge Structural Designer | ५०००/- | ७५००/- |
| १२ | Building Structural Designer | ५०००/- | ७५००/- |
| १३ | Quality & Material Engineer | ५०००/- | ७५००/- |
| १४ | Environment Expert | ५०००/- | ७५००/- |
| १५ | Feasibility / Cash Flow Expert | ५०००/- | ७५००/- |
| १६ | Social Impact & R& R Expert | ५०००/- | ७५००/- |
| १७ | Road Safety expert | ५०००/- | ७५००/- |
| १८ | Quantity Engineer | ४०००/- | ६०००/- |
| १९ | Architect | ५०००/- | ७५००/- |
| २० | Interior Decorator | ४०००/- | ६०००/- |
| २१ | Landscape Expert | ५०००/- | ७५००/- |
| २२ | Senior Surveyor | ३०००/- | ४०००/- |
| २३ | Senior AutoCAD Draftsman | २०००/- | २५००/- |
| २४ | Traffic Survey Expert | ३०००/- | ४०००/- |
| २५ | Computer / Hardware Expert | २०००/- | ३०००/- |
| २६ | Site Supervisor | १५००/- | २०००/- |
| २७ | Document Expert (English / Marathi) | १५००/- | २०००/- |

| |
|---|
| Note:-Testing to be conducted on concrete & steel are payable to the consultant separately and they should be included in consultancy charges for forensic analysis to building and bridges. |
| नियुक्तीचे दिवस हे काम केलेले व करावयाचे दिवस मोजले जावेत. (सुटटया व रजा वगळून) |
| नियुक्ती करताना अंदाजित दिवस प्रकार-ब प्रमाणे १५ पेक्षा कमी असतील परंतु कामावर नियुक्त केल्यानंतर ३० पेक्षा जास्त सेवा घ्यावी लागल्यास प्रङ्कार-अ प्रमाणे रक्कम अदा करण्यात यावी. |
| कामाचे दिवस १५ ते ३० च्या दरम्यान असल्यास अधिक्षक अभियंता यांनी तज्ञाशी तडजोड करुन निर्णय मुख्य अभियंता यांना कळवावा. |